# महाराष्ट्र शासन

क्रमांक : गौखनि -३३/०३१८/प्र.क्र.१२५/ख

महसूल व वन विभाग
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १३/०३/२०२०.

**विषय : गौण खनिज-अहमदनगर**

मौजे सांगवी दुमाला, ता. श्रीगोंदा, जि. अहमदनगर या वाळूगटातून वाळूचे उत्खनन करता न आल्याने रक्कम परत करणेबाबत.
- श्री. संदीप फराटे.

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, अहमदनगर यांना त्यांचे पत्र क्र.गौख/कार्या ४अ/२८७/२०१८, दि.१६/०३/२०१८, क्र.गौख/कार्या ४क/६९९/२०१८, दि.१४/०५/२०१८ रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रांस अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१६-१७ करिता मौजे सांगवी दुमाला, ता. श्रीगोंदा येथील २४२२ ब्रास वाळूचा लिलाव श्री. संदीप संभाजी फराटे यांना रु. ९०,१०,९०६/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला. त्याअनुषंगाने दि. २८.२.२०१७ रोजी करारनामा करण्यात येवून दि.३०.९.२०१७ पर्यतच्या मुदतीकरिता दि. १.३.२०१७ रोजी मंजूरी आदेश पारित करण्यात आले. लिलावधारक यांना सदर वाळूगटाचा ताबा दि. ९.३.२०१७ रोजी देण्यात आला.

लिलावधारक यांनी सदर वाळूगटात पाणी असल्याने दि. २८.२.२०१७ रोजी सक्शन पंपाद्वारे उत्खनन करण्यास परवानगी देणेबाबत विनंती अर्ज केला होता. विभागीय आयुक्त, नाशिक यांनी दिलेल्या परवानगीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी लिलावधारकास ७० एच.पी. क्षमतेचे १० सक्शन पंप मंजूर केले. मा. राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण नवी दिल्ली यांनी दि. १९.४.२०१७ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने दि. २२.४.२०१७ रोजी सदर सक्शन पंपाची परवानगी पुढील आदेश होईपर्यंत रद्द करण्यात आली. तसेच मंजूर वाळू भूखंडातील वाळूचे उत्खनन हे सक्शन पंपाद्वारे न करता करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार करण्याबाबत कळविण्यात आले.

जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी सदर वाळूगटामधून कोणत्याही प्रकारे वाळूचे उत्खनन करण्यात आलेले नाही, असे कळविले आहे. तसेच महाऑनलाईन या प्रणालीवर श्री. फराटे यांनी सदर वाळूगटाची नोंद केली होती. तथापि, सदर वाळूगटातून कोणत्याही वाहनाचे नोंद झाल्याची दिसून येत नाही. तसेच श्री. संदिप फराटे यांनी तहसिलदार, श्रीगोंदा यांना दि. ३०.६.२०१७ रोजी त्यांना देण्यात आलेले वाहतूक पास परत केले आहेत. लिलावधारक श्री. संदीप फराटे यांनी सदर वाळूगटातून एकही ब्रास वाळूचे उत्खनन केले नसल्याने लिलावाची संपूर्ण रकमेची मागणी केली आहे.

२. लिलावधारकाने मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.४४१/२०१९ दाखल केली आहे. सदर रिट याचिकेमध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.६/११/२०१९ रोजी लिलावधारकाने जमा केलेली रक्कम रू.९०,१०,९०६/- परत करण्याचे आदेश पारीत केले.

सदर आदेशाच्या अनुषंगाने मौजे सांगवी दुमाला, ता. श्रीगोंदा या वाळूगटाचे लिलावधारक श्री.संदीप फराटे यांना वाळूगटातून वाळूचे उत्खनन करता न आल्याने त्यांनी शासनाकडे जमा केलेली रक्कम रू.९०,१०,९०६/- परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३. सबब, मौजे सांगवी दुमाला, ता. श्रीगोंदा या वाळूगटाचे लिलावधारक यांना रु.९०,१०,९०६/- **(रुपये नव्वद लाख दहा हजार नऊशे सहा फक्त)** इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. याबाबीवर होणारा खर्च सन २०१९-२० यावर्षाकरीता लेखाशिर्ष, “०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)” खाली उपलब्ध असलेल्या अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

५. सदर ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००३१३११३२०६७५१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=8c2377ed235498603821d49922a210871ff6fb9b369722ac707aee7dcd87f2bd, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2020.03.13 17:30:27 +05'30'

**(दिनेश चव्हाण)**

**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी अहमदनगर, अहमदनगर.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.

३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.

४) जिल्हा कोषागार अधिकारी अहमदनगर, अहमदनगर.

५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.

६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.

७) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.